**ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प व पेंच व्याघ्र प्रकल्पासाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखाली निर्माण करण्यात आलेली २२४ अस्थायी पदे सन २०२३-२०२४ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०२.२३/प्र.क्र.६६/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२३.

वाचावे :-

१. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: असंक-१००१/प्र.क्र.२९ /(भाग-६)/ २००४/वित्तिय सुधारणा-१, दि.०१.०७.२००४.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: असंक-१००१/प्र.क्र.२९ /(भाग-७)/२००४/वित्तिय सुधारणा-१, दि.०१.०९.२००४.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.४.१०.२००४.
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९.
५. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.२१.०९.२०२१.
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.२२/प्र.क्र.७०/फ-१, दि.१७.०३.२०२२.
७. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.२२/प्र.क्र.७०/फ-१, दि.१६.०९.२०२२.
८. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-३/ योजनेत्तर/प्र.क्र. ४७ (२२-२३)/१९३, दि. १९.०१.२०२३.
९. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०८.०२.२०२३.

प्रस्तावना:-

ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प व पेंच व्याघ्र प्रकल्पासाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांना सन २०२२-२०२३ मध्ये संदर्भ क्रमांक ६ व ७ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. आता संदर्भ क्रमांक ८ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सबब ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प व पेंच व्याघ्र प्रकल्पासाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांना सन २०२३-२०२४ मध्ये दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक २९.०२.२०२४ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

३. प्रशासकीय विभागांच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक ९ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सबब  ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प व पेंच व्याघ्र प्रकल्पासाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांना सन २०२३-२०२४ मध्ये दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सबब, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प व पेंच व्याघ्र प्रकल्पासाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च "२४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२, पर्यावरणीय वनीकरण आणि वन्यजीवन, ११० वन्यजीव संरक्षण, (००)(०४) व्याघ्र प्रकल्प (६० टक्के केंद्र हिस्सा) (२४०६ १२४३) व २४०६ वनीकरण व वन्यजीव, ०२ पर्यावरणीय वनीकरण आणि वन्यजीव, ११० वन्यजीव संरक्षण, (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० टक्के राज्य हिस्सा) (२४०६ए१०२)" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय, क्रमांक: असंक्र-१००१/प्र.क्र.२९/(भाग-६)/२००४/ वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०१.०७.२००४, क्रमांक: असंक्र-१००१/प्र.क्र.२९/ (भाग-७)/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०१.०९.२००४, क्रमांक: असंक/१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८.०२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१३१९०१४९१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.03.14 11:35:24 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
६) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
७) महालेखापाल-२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई - ३२,
८) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

********

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०२.२३/प्र.क्र.६६/फ-१,**
**दिनांक: १३ मार्च, २०२३ सोबतचे विवरणपत्र.**
**(दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| **अ.क्र** | **पद** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | सहाय्यक वनसंरक्षक | २ |
| २ | वनक्षेत्रपाल | ६ |
| ४ | वनरक्षक | १६२ |
| ५ | वन निरिक्षक | ५४ |
| | **एकूण** | **२२४** |

******